**सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता मागणी क्रमांक एक्स-१ मुख्य लेखाशिर्ष " २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण " या लेखाशिर्षाअंतर्गत वितरीत करावयाच्या निधीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: मबाआ-२०२२/प्र.क्र.८१ /का-७अ**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: ३१ मार्च, २०२२.

**संदर्भ:-** शासन परिपत्रक वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. १४.१०.२०२१ व दि.१७.०३.२०२२.

**प्रस्तावना:**

महिला व बाल विकास विभागातंर्गत २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण या मुख्य लेखाशीर्षातंर्गत १०-कंत्राटी सेवा या उद्दीष्टशीर्षाखाली वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१७.०३.२०२२ येथील परिपत्रकानुसार सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षामध्ये उर्वरित अनुज्ञेय होणारा निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे वितरीत करण्यास मंजुरी देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील खर्च भागविण्यासाठी वित्त विभागाच्या शासन परिपत्रक दि.१७.०३.२०२२ अन्वये आर्थिक वर्षाच्या उर्वरित कालावधीसाठी विविध उद्दीष्टांच्या अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत तरतुदींचा उर्वरित संपूर्ण निधी एकत्रितरित्या बीम्स प्रणालीवर वितरित करण्यात आला असून १००% तरतूद उपलब्ध झाली आहे.

२. सन-२०२१-२२ या आर्थिक वर्षामध्ये लेखाशिर्ष २२३५-२०७-२,१०-कंत्राटी सेवा या बाबीकरिता रु.२,५९,०० हजार इतकी अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर आहे. तथापि, सन-२०२१-२२ च्या सुधारित तरतुदीनुसार रु. ३,५५,२९ हजार इतकी तरतूद उपलब्ध आहे. त्यापैकी रु.२,५९,०० हजार इतकी तरतूद वितरित करण्यात आली असून रु.९६२९ हजार इतकी तरतूद उपलब्ध आहे.

३. सदर बाबीमधून शासकीय संस्थांमध्ये नियुक्त करण्यात आलेल्या सुरक्षा रक्षकांचे नियमीत मानधन, जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी,पालघर या कार्यालयामध्ये बाहययंत्रणेद्वारे नेमणूक करण्यात आलेल्या कर्मचा-यांचे नियमीत मानधन तसेच, जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, जळगांव व सातारा कार्यालयातील वाहन चालकांचे नियमीत मानधन अदा केले जाते.

४. लेखाशिर्ष-२२३५-२०७-२, १०-कंत्राटी सेवा या बाबीकरिता संगणक वितरण प्रणालीवर उर्वरित रु.९६२९ हजार इतकी तरतूद संगणक वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहेत .

५. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे. त्यानुसार आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांनी वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक १४.१०.२०२१ च्या परिपत्रकामध्ये नमूद केलेल्या तपासणी सूचीतील बाबींची तसेच यासंदर्भात नियोजन विभाग व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना, प्रचलित निकष, वित्तीय अधिकाराचे प्रत्यायोजन यांचे काटेकोर पालन करावे.

६. याबाबत सन २०२१-२२ करीता वरील लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेला निधी खर्च करण्याची व त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करणे, याची दक्षता आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे यांनी घ्यावी.

७. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन परिपत्रकांमधील तरतुदीच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०४०६१७०९३७८५३० असा आहे. सदरचा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by SUNIL DEORAO SARDAR
Date: 2022.04.06 17:10:49 +05'30'

**( सुनिल सरदार )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे,
२) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई,
३) महालेखापाल १/२, ( लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर,
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई शहर/मुंबई उपनगर,
५) वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे ( आयुक्तालय,पुणे मार्फत ),
६) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी(आयुक्तालय,पुणे मार्फत),
७) सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी(आयुक्तालय,पुणे मार्फत),
८) कार्यासन(व्यय-६/अर्थसंकल्प-७) वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई,
९) कक्ष अधिकारी(का.४), महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई,
यांना सदर निधी वितरीत करण्याच्या विनंतीसह अग्रेषित,
१०) निवड नस्ती-का-७ अ.